महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील सहायक पोलीस उपनिरीक्षक,पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई यांच्याकरीता पोलीस उपनिरीक्षक पदावर नियुक्तीसाठी पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा पूर्व परीक्षा- २०१७.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पोलीस-१११६/प्र.क्र.३४१/पोल-५अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: १४ जून, २०१७

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य पोलीस दलातील पोलीस उपनिरीक्षक संवर्गातील खाली नमूद केल्याप्रमाणे एकूण ३२२ पदांच्या भरतीकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत रविवार, दिनांक १० सप्टेंबर, २०१७ रोजी पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा पूर्व परीक्षा -२०१७ मुंबईसह महाराष्ट्रातील ७ जिल्हाकेंद्रांवर घेण्यात येईल-:

| अ.क्र. | वर्गवारी | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अनुसूचित जाती | ४४ |
| २ | अनुसूचित जमाती | ४* +३२ |
| ३ | विमुक्त जाती (अ) | ५ |
| ४ | भटक्या जमाती (ब) | १* +९ |
| ५ | भटक्या जमाती (क) | १९* +१७ |
| ६ | भटक्या जमाती (ड) | २७ |
| ७ | विशेष मागास प्रवर्ग | ६ |
| ८ | खुला | १५८ |
| | एकूण | **३२२** |
| ***अनुषेशाची पदे** | | |

**२.**पूर्व परीक्षेच्या निकालाआधारे मुख्य परीक्षेच्या प्रवेशासाठी पात्र ठरलेल्या उमेदवारांची मुख्य परीक्षा रविवार, दिनांक २४ डिसेंबर, २०१७ रोजी किंवा त्यानंतर आयोजित होण्याची शक्यता आहे.

**३.** प्रस्तुत शासन परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता करणा-या उमेदवारांकडून ऑनलाईन पध्दतीने अर्ज मागविण्यात येत आहेत.

**४. पदसंख्या व आरक्षणासंदर्भात सर्वसाधारण तरतुदी:-**

**४.१** वर नमूद केलेल्या पदसंख्या व आरक्षणामध्ये शासनाच्या संबंधित विभागाच्या सूचनेनुसार बदल होण्याची शक्यता आहे. पदसंख्या व आरक्षणामध्ये बदल झाल्यास त्याचा समावेश मुख्य परीक्षेच्या शासन परिपत्रकामध्ये करण्यात येईल.

**४.२** वि.जा.(अ), भ.ज.(ब), भ.ज. (क), व भ.ज. (ड) या प्रवर्गासाठी आरक्षित पदे आंतरपरिवर्तनीय असून आरक्षित पदांसाठी संबंधित प्रवर्गातील योग्य व पात्र उमेदवार उपलब्ध न झाल्यास अद्ययावत शासन धोरणाप्रमाणे उपलब्ध प्रवर्गाच्या उमेदवाराचा विचार गुणवत्तेच्या आधारावर करण्यात येईल.

**४.३** परीक्षेच्या कोणत्याही टप्प्यावर मागासवर्गीयासाठी विहित केलेली वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक अटी/निकषांसंदर्भात कोणतीही सूट/सवलत घेतली असल्यास, अशा मागासवर्गीय उमेदवारांची अमागास (सर्वसाधारण) पदावर शिफारस करण्यात येणार नाही.

**४.४** अमागास उमेदवारांकरीता विहित केलेल्या वयोमर्यादा, शुल्क तसेच इतर पात्रता विषयक निकषांसदर्भातील अटींची पुर्तता करणा-या सर्व मागासवर्गीय उमेदवारांचा अमागास सर्वसाधारण पदावरील शिफारशींकरीता विचार होत असल्याने सर्व मागास प्रवर्गातील उमेदवारांनी (त्यांच्या प्रवर्गासाठी पद आरक्षित/उपलब्ध नसले तरी) अर्जामध्ये त्यांच्या मागास प्रवर्गासंदर्भातील सत्य माहिती अचूकपणे नमूद करणे बंधनकारक आहे.

**४.५** शासन अधिसूचना, गृह विभाग, क्रमांक:उसप्रे-०३९८/सीआर-४५७/भाग-२/पोल-५अ, दिनांक १५ ऑक्टोबर, २००३ नुसार विकलांग उमेदवार सदर पदाकरीता पात्र नाहीत.

**५. अर्हता :-**

**५.१** महाराष्ट्र शासनाच्या गृह विभागाच्या अखत्यारीतील सध्या कार्यरत सहायक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या संवर्गातील कर्मचारीच प्रस्तुत परीक्षेस पात्र असतील.

**५.२ वयोमर्यादा:-**

(१) दिनांक १ जानेवारी, २०१७ रोजी वय ३५ वर्षांपेक्षा जास्त नसावे.

(२) महाराष्ट्र शासनाने मान्यता दिलेल्या मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत वय ४० वर्षांपेक्षा जास्त नसावे.

(३) पोलीस उप निरीक्षक, (सेवाप्रवेश) (तिसरी सुधारणा) नियम, २००८ नुसार एखाद्या वर्षी परीक्षा न झाल्यामुळे कमाल वयोमर्यादा पूर्ण होण्यापूर्वी परीक्षेच्या सलग तीन संधी मिळाल्या नसतील अशा उमेदवारांना कमाल वयोमर्यादेनंतर सलग होणा-या परीक्षेस बसण्याच्या उर्वरित संधी देण्यात येतील. तथापि, कोणत्याही परिस्थितीत या सलग संधी तीन पेक्षा जास्त असणार नाहीत.

(४) कमाल वयोमर्यादा पूर्ण होण्यापूर्वी परीक्षेच्या सलग तीन संधी मिळूनही उमेदवाराने एखाद्या परीक्षेसाठी अर्ज केलेला नसेल तर संबंधित उमेदवाराने सदर परीक्षेची संधी घेतली असे मानण्यात येईल.

(५) सेवाप्रवेश नियमातील कमाल वयोमर्यादा पूर्ण होण्यापूर्वी अर्ज करणा-या उमेदवारांना परीक्षेच्या कमाल संधी बाबत कोणतीही मर्यादा लागू नाही.

(६) विहित वयोमर्यादा इतर कोणत्याही बाबतीत शिथिल केली जाणार नाही.

**५.३ शैक्षणिक अर्हतेसह सेवा:-**

**५.३.१** सहायक पोलीस उपनिरीक्षक, पोलीस हवालदार, पोलीस नाईक व पोलीस शिपाई या पदावर नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून खालीलप्रमाणे किमान नियमित सेवा पूर्ण होणे आवश्यक आहे:-

(१) मान्यताप्राप्त विद्यापीठाच्या कोणत्याही शाखेचा **पदवीधर** असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत - **४ वर्षे नियमित सेवा.**

(२)महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची **एच.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण** किंवा महाराष्ट्र शासनाने एच.एस.सी. च्या समतुल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत - **५ वर्षे नियमित सेवा.**

(३)महाराष्ट्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची **एस.एस.सी. परीक्षा उत्तीर्ण** किंवा महाराष्ट्र शासनाने एस.एस.सी.च्या समतुल्य म्हणून मान्य केलेली अर्हता, अशा उमेदवारांच्या बाबतीत - **६ वर्षे नियमित सेवा.**

५.३.२ नियमित सेवेचा कालावधी खालीलप्रमाणे गणण्यांत येईल :-

(१) नामनिर्देशनाने नेमणूक झालेल्या कर्मचा-यांच्या नियमित नियुक्तीच्या दिनांकापासून

(२) अनुकंपा तत्वावर नेमणूक झालेल्या कर्मचा-यांच्या नियुक्तीच्या दिनांकापासून

(३) अन्य कारणास्तव सेवा नियमित झालेल्या कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्या सेवा नियमित केल्या संबंधीच्या शासन आदेशाच्या दिनांकापासून

(४) पदोन्नत कर्मचा-याच्या नियमित पदोन्नतीच्या दिनांकापासून

**६. परीक्षेचे टप्पे:-**

६.१ प्रस्तुत परीक्षा खालील तीन टप्प्यांमध्ये घेण्यात येईल:-

(१) पूर्व परीक्षा - १०० गुण (२) मुख्य परीक्षा - ३०० गुण (३) शारीरिक चाचणी - १०० गुण

६.२ शारीरिक चाचणी/प्रमाणपत्र तपासणीकरीता आमंत्रित केल्यानंतर पात्रतेसंदर्भातील सर्व आवश्यक मूळ प्रमाणपत्रे सादर करणे आवश्यक आहे. पात्रतेसंदर्भातील सर्व मूळ प्रमाणपत्रे तपासणीच्या वेळी सादर न केल्यास शिफारस/नियुक्तीसाठी विचार करण्यात येणार नाही.

**७. पूर्व परीक्षेकरीता शुल्क :-**

(१) अमागास - रुपये ३७३/-  (२) मागासवर्गीय - रुपये २७३/-

**८. पूर्व परीक्षा खालील सात जिल्हाकेंद्रांवर घेण्यात येईल :-**

| केंद्र | केंद्राचा सांकेतांक |
|---|---|
| औरंगाबाद | १५ |
| मुंबई | ३० |
| नागपूर | ३२ |
| पुणे | ३८ |

| केंद्र | केंद्राचा सांकेतांक |
|---|---|
| नांदेड | ३३ |
| अमरावती | १४ |
| नाशिक | ३५ |

**९. अर्ज करण्याची पध्दत :-**

९.१ प्रस्तुत परीक्षेसाठी फक्त ऑनलाईन पद्धतीने अर्ज स्वीकारण्यात येतील.

९.२ पात्र उमेदवाराला वेब-आधारित (Web-based) ऑनलाईन अर्ज https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळाद्वारे **दिनांक १४ जून, २०१७ ते दिनांक ४ जुलै, २०१७** या कालावधीतच सादर करणे आवश्यक राहील.

९.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या https://mahampsc.mahaonline.gov.in तसेच www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

९.४ आयोगास अर्ज सादर करताना माध्यमिक शालांत प्रमाणपत्रावर असलेल्या नावाप्रमाणेच नावाची नोंदणी करणे व आयोगास अर्ज सादर करणे आवश्यक आहे. अन्यथा, आयोगाच्या सूचनांचे उल्लंघन समजून कारवाई करण्यात येईल.

९.५ आयोगास चुकीची माहिती सादर करणा-या उमेदवारास सदर परीक्षेसाठी व यापुढील सर्व निवडीकरिता अपात्र ठरविण्यात येईल.

९.६ आयोगास अर्ज सादर केल्यानंतर विहित मुदतीत परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

९.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरिता उमेदवारांनी खाली नमूद केलेल्या पद्धतींचा अवलंब करावा :-

९.७.१ शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागावरील " माझे खाते " या लिंकवर क्लिक करावे.

९.७.२ "माझे खाते" या लिंकवर क्लिक केल्यानंतर "माझे ॲप्लीकेशन" सदरातील 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंकवर क्लिक करावे.

९.७.३ 'स्पर्धात्मक परीक्षा' या लिंक वर क्लिक केल्यानंतर अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरल्याच्या/न भरल्याच्या नोंदीसह दिसेल. -Unpaid॰ लिहिलेल्या पद/परीक्षेसमोर -Pay Now॰ अशी लिंक उपलब्ध असेल.

९.७.४ " Pay Now" या लिंकवर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील :- **(अ)** ऑनलाईन पेमेंट **(ब)** नागरी सुविधा केंद्र **(क)** चलनाव्दारे

९.७.५ क्रेडिट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेटबँकिंगच्या सहाय्याने ऑनलाईन परीक्षा शुल्क अदा करता येईल.

९.७.६ नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणा-या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र अथवा संग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. सदर कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहील.

९.७.७ चलनाव्दारे परीक्षा शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास उपलब्ध होणा-या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

९.७.८ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडल्यास अर्ज सादर केल्याच्या दोन तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर केल्यास त्यापुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

९.७.९ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन शुल्क भरण्याची कार्यवाही, तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दिनांक **४ जुलै, २०१७** रोजी **२३.५९** वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

९.७.१० चलनाद्वारे परीक्षाशुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दिनांक **५ जुलै, २०१७** पर्यंत बॅकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परीक्षा शुल्क भरल्यास वैध मानले जाणार नाही, तसेच परीक्षा शुल्काचा परतावाही केला जाणार नाही.

९.७.११ ऑनलाईन पध्दतीने परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला त्याच्या प्रोफाईलमध्ये परीक्षा शुल्काचा भरणा झाला आहे किंवा कसे याची स्थिती (status) अवगत होईल. त्याची उमेदवाराने अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वीच तपासणी करुन खात्री करणे अथवा परीक्षा शुल्काचा भरणा झाल्याबाबतची स्थिती उपलब्ध नसल्यास पुन्हा शुल्क भरण्याची अथवा चलन घेण्याची कार्यवाही करणे आवश्यक आहे. विहित दिनांकानंतर यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या तक्रारीची दखल घेतली जाणार नाही.

**९.८ केंद्र निवड :-**

९.८.१ परीक्षा शुल्काचा भरणा केल्यानंतर उमेदवाराला परीक्षा केंद्राची निवड करणे आवश्यक आहे. त्याकरीता "माझे खाते" मधील संबंधित परीक्षेची निवड करावी. त्यानंतर "केंद्र निवडा" या पर्यायावर क्लिक करावे. सदर पर्यायांतर्गत निवडलेल्या केंद्राची क्षमता दर्शविली जाईल. केंद्राच्या क्षमतेइतक्या अर्ज तत्पूर्वी प्राप्त झाले असतील, तर सदर केंद्र उपलब्ध नसून, दुसरे केंद्र निवडावे, असा संदेश प्राप्त होईल. केंद्राची निवड केल्यानंतर सेव्ह बटनावर क्लिक केल्यास केंद्र निवडीची व अर्ज भरण्याची प्रक्रिया पूर्ण होईल.

९.८.२ भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरण्याचा पर्याय निवडलेले उमेदवार शुल्क भरल्याच्या दिनांकाच्या दुस-या दिवशी केंद्र निवडीची प्रक्रिया करु शकतील. दुसरा दिवस कार्यालयीन सुटटी अथवा रविवारचा असेल, तर सदर कार्यवाही त्यानंतर लगेच येणा-या पुढील कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी करता येईल.

९.८.३ वरीलप्रमाणे केंद्रनिवडीची प्रक्रिया पूर्ण न केल्यास उमेदवाराने अर्जामध्ये दिलेल्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यामधील नमूद जिल्हाकेंद्रावर किंवा नजिकच्या जिल्हाकेंद्रावर प्रवेश देण्यात येईल. याबाबत आयोगाचे त्या त्या वेळचे धोरण व आयोगाचा निर्णय अंतिम मानण्यात येईल.

९.८.४ केंद्र बदलाबाबतची विनंती कोणत्याही परिस्थितीत मान्य करण्यात येणार नाही.

१०. अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे उमेदवार परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची व शर्तींची पुर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून उमेदवारांना तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु परीक्षेपूर्वी अथवा परीक्षेनंतर कोणत्याही टप्प्यावर, उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पुर्तता करीत नसल्याचे आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल तसेच संबंधित उमेदवाराची कृती ही आयोगाची फसवणूक समजून त्याच्यावर कायदेशीर कारवाई करण्यात येईल. याव्यतिरिक्त आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार संबंधित उमेदवाराला प्रतिरोधित (Debar) करण्याची कारवाई करण्यात येईल.

**११. सर्वसाधारण :-**

११.१ प्रस्तुत परीक्षा ही स्पर्धा परीक्षा असून पदोन्नतीसाठी पात्रता परीक्षा (Qualifying Examination) नाही. प्रस्तुत परीक्षेच्या निकालाच्या आधारे आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांची सक्षम प्राधिका-याकडून पात्रता तपासण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्याची कार्यवाही करण्यात येईल. सदर परीक्षेमधील उमेदवारांच्या कामगिरीच्या (Performance) आधारे नियुक्ती मागण्याचा उमेदवारास कोणताही हक्क असणार नाही.

११.२ परीक्षेस अर्ज सादर केल्यानंतर अथवा परीक्षा दिल्यानंतर उमेदवाराने राजीनामा दिल्यास अथवा कोणत्याही कारणास्तव नोकरी सोडल्यास अथवा विभागाने सेवा समाप्त केल्यास अथवा धारणाधिकार न ठेवता संवर्गबाह्य पदावर नेमणूक झाल्यास सदर परीक्षेच्या निकालाच्या आधारे संबंधित उमेदवार नियुक्तीसाठी पात्र असणार नाही.

११.३ "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०१५" तसेच तद्नंतर यासंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार नियुक्ती विषयक कार्यवाही करण्यात येईल.

**१२. शारीरिक चाचणीबाबत :-**

१२.१ मुख्य लेखी परीक्षेच्या निकालाआधारे शारीरिक चाचणीसाठी अर्हताप्राप्त ठरलेल्या उमेदवारांना शारीरिक चाचणी द्यावी लागते हे विचारात घेऊन उमेदवारांनी वेळीच त्यासाठी सराव व पूर्वतयारी करावी. मुख्य लेखी परीक्षेच्या निकालानंतर सर्वसाधारणपणे दोन आठवड्याच्या अंतराने कधीही शारीरिक चाचणी आयोजित केली जाईल. सरावासाठी पुरेसा वेळ मिळाला नसल्याच्या कारणास्तव शारीरिक चाचणीचे दिनांक बदलून मागता येणार नाहीत किंवा त्याबाबत तक्रार करता येणार नाही.

१२.२ आयोगाकडून शारीरिक चाचणीचा कार्यक्रम निश्चित होताच तो आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येईल. तसेच, आयोगाच्या ऑनलाईन अर्ज प्रणालीतील संबंधित पात्र उमेदवारांना त्यांच्या प्रोफाईलद्वारे कळविण्यात येईल.

१२.३ आयोगाने निश्चित केलेल्या दिनांकास व ठिकाणी संबंधित उमेदवाराने शारीरिक चाचणीसाठी उपस्थित राहणे आवश्यक आहे. शारीरिक चाचणीसाठी निश्चित केलेल्या दिनांक व वेळेमध्ये बदल करण्याबाबतची विनंती मान्य केली जाणार नाही व त्यामुळे उमेदवाराची शारीरिक चाचणीची संधी वाया गेल्यास त्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची असेल.

१२.४ वैद्यकीय कारणास्तव शारीरिक चाचणीचा दिनांक बदलून देण्याची विनंती करणा-या उमेदवारांना वैद्यकीय प्रमाणपत्रामध्ये नमूद केलेल्या आजार/दुखापत, त्याचे स्वरुप, गांभीर्य व सत्यता तपासणीसाठी लगेचच आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस सक्षम वैद्यकीय मंडळापुढे पाठविण्यात येईल.तसेच वैद्यकीय मंडळाने फिटनेस (Fitness) प्रमाणपत्र प्रदान केले तरच त्यांना आयोगाने निश्चित केलेल्या ठिकाणी व वेळेस शारीरिक चाचणीसाठी उपस्थित राहण्याची परवानगी देण्यात येईल.

१२.५ वैद्यकीय कारणास्तव शारीरिक चाचणीसाठी मुदतवाढ मागणा-या उमेदवारांच्या बाबतीत सत्यता तपासणीनंतर वैद्यकीय मंडळाकडून प्रतिकूल अहवाल प्राप्त झाल्यास संबंधित उमेदवाराला शारीरिक चाचणीची संधी नाकारण्यात येईल. तसेच, अशा प्रकरणी आयोगाची फसवणूक करण्याचा प्रयत्न समजून संबंधित उमेदवारांवर कायदेशीर कारवाई करण्यात येईल. तसेच उमेदवाराची संबंधित परीक्षेची उमेदवारी रद्द करण्यात येऊन आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार आयोगामार्फत आयोजित सर्व परीक्षा व निवडीपासून उमेदवाराला प्रतिरोधित (Debar) करण्यात येईल. त्याव्यतिरिक्त संबंधित उमेदवारांवर शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

१२.६ अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत तसेच समर्थनीय कारणासह अर्ज केलेल्या उमेदवारांना शारीरिक चाचणीचा दिनांक व वेळ बदलून देण्याच्या विनंतीबाबत आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार, विचार करण्यात येईल. एखाद्या प्रकरणी आयोगाने विनंती अमान्य केली असेल तर संबंधित उमेदवाराला पूर्व नियोजित वेळापत्रकानुसार निश्चित केलेल्या दिनांक व वेळेनुसार शारीरिक चाचणीसाठी उपस्थित रहावे लागेल. तद्नंतर उमेदवाराला पुढील संधी दिली जाणार नाही.

**१३. प्रवेशप्रमाणपत्र :-**

१३.१ प्रस्तुत परीक्षेपूर्वी सर्वसाधारणपणे ७ दिवस अगोदर प्रवेश प्रमाणपत्र उमेदवाराच्या प्रोफाईलदवारे उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याची प्रत परीक्षेपूर्वी डाऊनलोड करुन घेणे व परीक्षेच्या वेळी सादर करणे आवश्यक आहे.

१३.२ परीक्षेच्या वेळी उमेदवाराने स्वत:चे प्रवेश प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे. त्याशिवाय, परीक्षेस प्रवेश दिला जाणार नाही.

**१४. परीक्षेस प्रवेश:-**

**१४.१** परीक्षेस व शारीरिक चाचणीस येतेवेळी स्वत:च्या ओळखीच्या पुराव्यासाठी स्वत:चे आधार कार्ड, निवडणूक आयोगाचे ओळखपत्र, पासपोर्ट, पॅन कार्ड किंवा स्मार्ट कार्ड प्रकारचे ड्रायव्हिंग लायसेन्स यापैकी किमान कोणतेही एक मूळ ओळखपत्र व त्याची छायांकित प्रत सोबत आणणे अनिवार्य आहे.

**१४.२** परीक्षा तसेच शारीरिक चाचणीच्या वेळी प्रवेश प्रमाणपत्र व इतर ओळखीच्या पुराव्यासह उमेदवाराने अद्ययावत कार्यालयीन ओळखपत्र सादर करणे आवश्यक आहे.

**१४.३** फक्त पेन, पेन्सिल, प्रवेशप्रमाणपत्र, ओळखीचा मूळ पुरावा व त्याची छायांकित प्रत अथवा प्रवेशप्रमाणपत्रावरील सूचनेनुसार आयोगाने परवानगी दिलेल्या साहित्यासह उमेदवाराला परीक्षा कक्षात प्रवेश देण्यात येईल.

**१४.४** डिजीटल डायरी, पेजर, मायक्रोफोन, मोबाईल फोन, कॅमेरा अंतर्भूत असलेली कोणत्याही प्रकारची साधने, सिमकार्ड, ब्लू टूथ, दूरसंचार साधने म्हणून वापरण्या योग्य कोणतीही वस्तू, इलेक्ट्रॉनिक उपकरणे, वहया, नोटस, परवानगी नसलेली पुस्तके, बॅग्ज, परिगणक (calculator) इत्यादी प्रकारची साधने / साहित्य परीक्षा केंद्राच्या परिसरात तसेच परीक्षा कक्षात आणण्यास, स्वत:जवळ बाळगण्यास, त्याचा वापर करण्यास अथवा त्याच्या वापरासाठी इतरांची मदत घेण्यास सक्त मनाई आहे. असे साहित्य आणल्यास ते परीक्षा केंद्राबाहेर ठेवण्याची व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील.

**१४.५** आयोगाने परवानगी नाकारलेले कोणत्याही प्रकारचे अनधिकृत साधन/साहित्य परीक्षेच्यावेळी संबंधित उपकेंद्राच्या मुख्य प्रवेशद्वारावरच ठेवावे लागेल. अशा साधन/साहित्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. यासंदर्भातील कोणत्याही प्रकारच्या नुकसानीस आयोग, जिल्हा प्रशासन किंवा शाळा/महाविद्यालय व्यवस्थापन जबाबदार राहणार नाही.

**१४.६** उमेदवाराने आयोगास सादर केलेल्या अर्जावरील स्वाक्षरी, हजेरीपटावरील स्वाक्षरी व अन्य सर्व प्रकारच्या पत्रव्यवहारावरील स्वाक्षरी एकच असणे व त्यामध्ये कोणत्याही प्रकारचा फरक/तफावत असता कामा नये. विविध ठिकाणच्या स्वाक्षरीमध्ये फरक/तफावत आढळून आल्यास संबंधित उमेदवाराची उमेदवारी रद्द करण्यात येईल व आयोगाच्या स्वेच्छाधिकारानुसार इतरही कायदेशीर/नियमानुसार कारवाई करण्यात येईल.

**१४.७** परीक्षेची वेळ संपल्यानंतर समवेक्षकांनी त्याच्या अधिपत्याखालील सर्व उमेदवारांच्या उत्तरपत्रिका त्याच्याकडे जमा करुन उत्तरपत्रिकांचा हिशोब लागेपर्यंत सर्व उमेदवारांनी आपापल्या जागेवर शांतपणे बसून राहणे आवश्यक आहे. समवेक्षकाने परवानगी दिल्याशिवाय कोणत्याही उमेदवाराला परीक्षा कक्षाच्या बाहेर जाता येणार नाही.

**१५.** प्रस्तुत परिपत्रकामध्ये परीक्षेसंदर्भातील संक्षिप्त तपशील दिलेला आहे. अर्ज स्वीकारण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, आरक्षण, वयोमर्यादा, शुल्क, निवडीची सर्वसाधारण प्रक्रिया, परीक्षा योजना, अभ्यासक्रम इत्यादीबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या संकेतस्थळावरील मर्यादित विभागीय परीक्षा अंतर्गत '**उमेदवारांना सर्वसाधारण सूचना**' तसेच "**परीक्षा योजना**" विभागातील **“पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा परीक्षा”** मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती व परिपत्रक अधिकृत समजण्यात येईल.

**१६.** प्रस्तुत परिपत्रक आयोगाच्या www.mpsc.gov.in तसेच https://mahampsc.mahaonline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे.

**१७.** सदर परिपत्रकासोबतच्या **"विवरणपत्र-१"** मध्ये पूर्व परीक्षेची योजना व अभ्यासक्रमाचा समावेश केला आहे.

**१८.** सदर परिपत्रक रजेवर/प्रतिनियुक्तीवर असणा-या कर्मचा-यांसह सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे.

**१९.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१४१३२६२७२०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2017.06.14 13:25:47 +05'30'

**( व्यं. मा. भट )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने).

## विवरणपत्र - १

## पोलीस उपनिरीक्षक मर्यादित विभागीय स्पर्धा पूर्व परीक्षेची परीक्षा योजना व अभ्यासक्रम -

## - : परीक्षा योजना :-

| विषय (संकेतांक क्र. ०१४) | माध्यम | प्रश्नसंख्या व गुण | दर्जा | कालावधी | प्रश्नपत्रिकेचे स्वरुप |
|---|---|---|---|---|---|
| मराठी | मराठी | २५ | शालांत | एक तास | वस्तुनिष्ठ बहुपर्यायी |
| इंग्रजी | इंग्रजी | २५ | | | |
| सामान्य अध्ययन | इंग्रजी व मराठी | ५० | | | |

## -:अभ्यासक्रम: -

| अ. क्र. | घटक व उप घटक | गुण |
|---|---|---|
| **(अ)मराठी** | सर्वसामान्य शब्दसंग्रह, वाक्यरचना, व्याकरण, म्हणी व वाक्प्रचार यांचा अर्थ व उपयोग तसेच उताऱ्यावरील प्रश्नांची उत्तरे. | **२५** |
| **(ब)इंग्रजी** | General Vocabulary, Sentence Structure, Grammar, Idioms & Phrases- their meaning and use, Comprehension. | **२५** |
| **(क)सामान्य अध्ययन** | | **५०** |
| (१) | आधुनिक भारताचा इतिहास. | |
| (२) | भारताचा विशेषत: महाराष्ट्राचा भूगोल | |
| (३) | भारतीय अर्थव्यवस्था :- जागतिकीकरण, उदारीकरण, खाजगीकरण यांच्या विशेष अभ्यासासह. | |
| (४) | ग्राम-प्रशासन, जिल्हा-प्रशासन, राज्य-प्रशासन:- रचना, संघटन, कार्ये. | |
| (५) | महाराष्ट्रातील समाजसुधारक. | |
| (६) | भारताचे शेजारील राष्ट्रांशी असलेले संबंध. | |
| (७) | चालू घडामोडी. | |